**महिलांच्या अत्याचाराच्या विरुध्द कामगिरी करणा-या नागरीकांना "निर्भय" पुरस्कार देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १२ मे, २०१५**

**प्रस्तावना :-**

राज्यातील महिलांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने शासनस्तरावरुन विविध उपाययोजना करण्यात येत आहेत. महिलांवर अत्याचार झाल्यानंतर पोलीस ठाण्यात गुन्हा नोंदवून आरोपीस कडक कायदेशिर शिक्षा करणे जितके महत्वाचे आहे त्यापेक्षा सदरचे अत्याचार रोखणे महत्वाचे आहे. महिलांवर अत्याचार होत असताना सजग व जागरुक नागरीकांनी असे अत्याचार रोखण्याकरिता सहभाग घेतल्यास महिलांमध्ये अधिक सुरक्षिततेची भावना निर्माण होईल. महिलांवर अत्याचार रोखण्यास सहभाग घेणा-या नागरीकांना शासनाकडून प्रोत्साहन मिळाल्यास अधिकाअधिक नागरीक यामध्ये सहभागी होतील असे शासनाचे मत झाले आहे. सबब, महिलांच्या अत्याचाराच्या विरुध्द कामगिरी करणा-या नागरीकांसाठी शासनाच्या वतीने पुरस्कार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिलांवरील अत्याचाराविरुध्द कामगिरी करणाऱ्या नागरिकांसाठी राज्य शासनाच्या वतीने "निर्भय" पुरस्कार देण्यास सदर शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरच्या "निर्भय" पुरस्काराचे स्वरुप रक्कम रु. १ लाख रोख रक्कम व प्रशस्तिपत्रक असे राहील.

३. "निर्भय"पुरस्काराकरिता प्रस्तावाचा नमुना, पात्रतेचे निकष व प्रशस्ती पत्रकाचे स्वरुप याबाबत स्वतंत्र मार्गदर्शक सुचना पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांनी शासनाच्या मान्यतेने अंतिम कराव्यात.

४. पोलीस आयुक्त व पोलीस अधिक्षक यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये महिलांवरील अत्याचाराविरुध्द कामगिरी केलेल्या नागरीकांची शिफारस "निर्भय" पुरस्काराकरिता पोलीस महासंचालक यांच्या अध्यक्षतेखाली समितीकडे पाठवावी.

५. एक वर्षात महिलांवरील अत्याचाराविरुध्द कामगिरी केलेल्या नागरीकांची "निर्भय" पुरस्काराकरिता शिफारस पोलीस आयुक्त व पोलीस अधिक्षक यांनी दिनांक ३१ डिसेंबर पर्यंत करावी.

६. प्रत्येक वर्षामध्ये शासनाच्या वतीने "निर्भय" पुरस्कार देण्याकरिता प्राप्त प्रस्तावांची छाननी करण्याकरिता खालीलप्रमाणे समितीची स्थापना करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| पोलीस महासंचालक | -अध्यक्ष |
| पोलीस महासंचालक (लाचलुचपत प्रतिबंधक विभाग) | - सदस्य |
| पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई | - सदस्य |
| अपर पोलीस महासंचालक (कायदाव सुव्यवस्था) | - सदस्य |
| अपर पोलीस महासंचालक (आस्थापना) | -सदस्य सचिव |

**७.** सदर समिती आपली कार्यकक्षा व कार्यप्रणाली स्वत: ठरवेल व प्राप्त प्रस्तावांची छाननी करुन पात्र नागरिकांची “निर्भय” पुरस्कारासाठी शासनाकडे शिफारस करेल.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१३१३२८५४३८२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 13:31:11 +05'30'

**(द.सं.पाटील)**

**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
७. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
९. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
१०. सर्व पोलीस आयुक्त
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१२. सर्व अपर पोलीस महासंचालक
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१५. सर्व पोलीस अधीक्षक
१६. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१८. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
१९. उप सचिव (वि.शा.-६)
२०. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. निवडनस्ती